**सामान्य प्रशासन विभाग (खुद्द) व अधिनस्त कार्यालयांच्या आस्थापनेवरील वाहनांचा आढावा.**

**महाराष्ट्र शासन**

सामान्य प्रशासन विभाग,

शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण ११०९/प्र.क्र.३३८/०९/१९-अ

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक - २७ सप्टेंबर, २०११.

**वाचा :** १. शासन निर्णय वित्त विभाग क्र.वाहन १०००/प्र.क्र.६५/२००१/विनियम, दि.१०.९.२००१.

२. शासन निर्णय वित्त विभाग क्र.वाहन १०.०५/प्र.क्र.१३/२००५/विनियम, दि.२५.५.२००५.

३. शासन निर्णय वित्त विभाग क्र.वाहन १००७/प्र.क्र.४८/२००७/विनियम, दि.३१.१२.२००७.

**प्रस्तावना :** सामान्य प्रशासन विभाग व अधिनस्त कार्यालये उदा.मुख्य सचिव कार्यालय, निवडणूक शाखा, मंत्री आस्थापना, राज्य माहिती आयोग, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, विमानचालन संचालनालय इ. याअंतर्गत आस्थापनेवरील अधिकारी/ कर्मचारी यांच्या कामाचे स्वरुप व कक्षा पहाता अशा पदांकरिता अनुज्ञेय वाहनांबाबतचा आढावा घेण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय :** सामान्य प्रशासन विभाग (खुद्द) व अधिनस्त कार्यालयांच्या आस्थापनेवरील सर्व पदांची कर्तव्ये व जबाबदा-यांचा विचार करुन कोणत्या पदांकरिता वाहन सुविधा उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे याबाबत निर्णय घेण्यात आला असून त्यानुसार पुढीलप्रमाणे वाहन आढावा मंजूर करण्यात येत आहे.

| अ. क्र. | कार्यालयाचे नाव | वाहन अनुज्ञेय आहे असे पदनाम (वाहनसंख्या) | आढाव्यानुसार अनुज्ञेय वाहन संख्या |
|---|---|---|---|
| १ | सामान्य प्रशासन विभाग (खुद्द) | मुख्य सचिव (२)कार<br>अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव एकूण सहा पदे (६)कार<br>विभागातील इतर अधिकारी/कर्मचारी (१)स्टाफ कार | ९ |
| २ | निवडणूक शाखा | सचिव व मुख्य निवडणूक अधिकारी (१) कार<br>निवडणूक शाखेतील अधिकारी/कर्मचारी (१) स्टाफ कार | २ |
| ३ | मंत्री आस्थापना | मुख्यमंत्री कार्यालयाचे ,<br>प्रधान सचिव (१) कार<br>सचिव (१) कार<br>सचिव उपमुख्यमंत्री (१) कार<br>जनसंपर्क कक्ष (१) कार | ४ |
| ४ | राज्य माहिती आयोग | मुख्य माहिती आयुक्त (१) कार<br>राज्य माहिती आयुक्त<br>(नागपूर/औरंगाबाद/पुणे/कोकण/बृहन्मुंबई/अमरावती/नाशिक खंडपीठ) (७) कार | ८ |
| ५ | महाराष्ट्र लोकसेवा आयोग | आयोगाचे अध्यक्ष (१) कार<br>आयोगाचे सदस्य (५) कार<br>सचिव (१) कार<br>अधिकारी/कर्मचारी (१) स्टाफ कार | ८ |

| | | | |
|---|---|---|---|
| ६ | यशदा, पुणे | महासंचालक (१) कार<br>उपसंचालक (३) कार<br>इतर अधिकारी/ कर्मचारी (निबंधकासह) (३ स्टाफ कार + १बस) | ८ |
| ७ | मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रबोधिनी, नाथनगर, औरंगाबाद | विशेष कार्यकारी अधिकारी (१ जीप) | १ |
| ८ | डॉ. पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती | उपआयुक्त तथा विशेष कार्यकारी अधिकारी (१ जीप) | १ |
| ९ | लोकआयुक्त आणि उपलोकआयुक्त कार्यालय | लोक आयुक्त (१) कार<br>उपलोकआयुक्त (१) कार<br>अधिकारी/कर्मचारी (१) स्टाफ कार | ३ |
| १० | राज्यपाल यांचे परिवार प्रबंधक कार्यालय, मुंबई | मा. राज्यपाल , त्यांच्या पत्नी, त्यांचे अतिथी व ताफयासाठी (८) कार | ८ |
| ११ | राज्यपाल यांचे सचिव कार्यालय, मुंबई | राज्यपालांचे सचिव (१) कार<br>सचिव/ सह सचिव, वैधानिक विकास मंडळ (१) कार | २ |
| १२ | सैनिक कल्याण विभाग, पुणे | संचालक (१) कार<br>जिल्हा सैनिक अधिकारी (३१ पदे) (३१ जीप) | ३२ |
| १३ | सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था, औरंगाबाद | संचालक (१) कार | १ |
| १४ | विमानचालन संचालनालय | संचालक /सहायक संचालक(१) कार<br>मुख्य वैमानिक (१) कार<br>वरिष्ठ वैमानिक / वैमानिक (४) | ६ |
| १५ | माहिती व जनसंपर्क संचालनालय व अधिनस्त कार्यालये | माहिती व जनसंपर्क कार्यालय, मुंबई (२४)<br>महाराष्ट्र परिचय केंद्र, नवी दिल्ली (३)<br>संचालक (माहिती) नागपूर (४)<br><br>संचालक (माहिती), औरंगाबाद(३)<br>विभागीय आयुक्त (माहिती कार्यालय)<br>अमरावती/पुणे/लातूर/कोल्हापूर/नाशिक/कोकण प्रत्येकी ३ (१८)<br><br>जिल्हा माहिती कार्यालये प्रत्येकी २ याप्रमाणे (३३ X २) (६६)<br>जिल्हा माहिती कार्यालये शिर्डी , अहमदनगर (१)<br>प्रकर्षित प्रसिध्दी पथक चित्ररथ योजना, गडचिरोली (१)<br>महाराष्ट्र परिचय केंद्र, पणजी, गोवा (२) | १२२ |
| १६ | राज्य निवडणूक आयोग | आयुक्त (१) कार<br>सचिव (१) कार<br>इतर अधिकारी/कर्मचारी (१) स्टाफ कार | ३ |

| | | | |
|---|---|---|---|
| १७ | महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकारण | अध्यक्ष व सदस्य (दहा पदे)<br>मुंबई (४) कार<br>नागपूर (३) कार<br>औरंगाबाद (३) कार | १० |
| १८ | माहिती व तंत्रज्ञान | संचालक तथा उपसचिव(१) कार | १ |
| | | **एकूण** | **२२९** |

२. वरील आढाव्यानुसार वित्त विभागाच्या दि.१०.९.२००१ च्या शासन निर्णयाअन्वये नवीन वाहन खरेदीस निर्बंध आहेत. तसेच जी वाहने निर्लेखित होतील त्यावेळी नवीन वाहन खरेदीऐवजी अतिरिक्त दर्शविण्यात आलेली वाहने हस्तांतरीत करण्यात यावीत. तसेच वित्त विभागाच्या दि.२५.५.२००५ च्या शासन निर्णयानुसार शासकीय कामासाठी स्वत:चे खाजगी वाहन वापरण्याचा पर्याय स्विकारलेल्या अधिका-यांना वित्त विभागाच्या दि.३१.१२.२००७ च्या शासन निर्णयानुसार ते त्या पदावर कार्यरत असेपर्यत सदर पर्याय स्विकारता येईल. तसेच ज्या अधिका-यांनी खाजगी वाहनांचा पर्याय स्विकारलेला आहे अशा अधिका-यांना शासकीय वाहने उपलब्ध करुन देण्याची आवश्यकता नाही.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१३३/विनियम, दि.३.९.२०११ अन्वये वित्त विभागाच्या सहमतीने व मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक 201109281104070001 असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( वि. द. शिंदे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रति,

१. मा.मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक,
२. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
३. प्रधान सचिव (वित्त), वित्त विभाग तथा अध्यक्ष, राज्यस्तरीय वाहन आढावा समिती,
४. प्रधान सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.
५. सचिव (प्र.सु.व र.व.का.) सामान्य प्रशासन विभाग तथा सदस्य, राज्यस्तरीय वाहन आढावा समिती,
६. परिवहन आयुक्त, सदस्य सचिव, राज्यस्तरीय वाहन आढावा समिती,,
७. सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
८. सर्व सह सचिव/उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२,
९. कक्ष अधिकारी, कार्यासन क्र. ६,८,१२-अ,१५, २०-अ, २१(आस्था), २४, २८, २८-अ, ३३, ३४, ३७, ३८, ३९, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२ यांना अधिनस्त कार्यालयांना अवगत करण्याच्या विनंतीसह.
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा), महाराष्ट्र राज्य-१ व २, मुंबई/नागपूर,
११. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१३. वित्त विभाग (कार्या-विनियम), मंत्रालय, मुंबई-३२,
१४. निवड नस्ती-१९-अ.

D:\Gad-d.19-A\vahan adhava-GADGR 338.lwp